**कृषी उन्नती योजना-राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियानांतर्गत (गळीतधान्य व तेलताड) करिता सन २०१८-१९ चा अखर्चित ₹ ४११.१८ लाख निधी पुनर्जिवित करून सन २०१९-२० मध्ये अभियानांतर्गत अनुसूचित जाती प्रवर्गासाठी विनियोगात आणण्यास मान्यता प्रदान करणे.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : राअसुअ-१२१९/प्र.क्र.६६/४-अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : १९ मार्च, २०२०

**संदर्भ:-**

१. केंद्र शासनाचे अभियाना संदर्भात http://agricoop.nic.in/dacdiviion/dacdiviion/NMOOP२०१४.pdf या संकेतस्थळावर उपलब्ध करुन दिलेल्या मार्गदर्शक सूचना
२. आदिवासी विकास विभाग शासन निर्णय क्र.बीयुडी-२०१६/प्र.क्र.२४९/कार्यासन-६, दि.०३/०४/२०१७
३. वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं-२०१९/प्र.क्र.४४/अर्थ-३ दि. ०१/०४/२०१९
४. केंद्र शासनाचे पत्र क्र.४-१/२०१९-NFSM(OS &OP)/C.NO.६८१६७, दि.२६/०६/ २०१९
५. कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्र.अेअेपी-२०१९/प्र.क्र.४०/४-अे, दि.०८/०७/ २०१९
६. केंद्रीय कृषी मंत्रालयाचे पत्र-६-१३/२०१८-AAP(Coord/OS)(५५६१२), दि.२४/०७/२०१९
७. कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र.वि.प्र.२/राअसु(गळीत)१९-२०/पुनर्जि.निधी/अ.वा./प्र.क्र.०८/११०/१९, दि.३१/०७/२०१९
८. कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र.वि.प्र.२/राअसु(गळीत)१९-२०/वि.मा.अ.जा./अ.वा./प्र.क्र.०८/१०१७२/१९, दि.११/०३/२०२०

**प्रस्तावना:-**

तेलबियांच्या उत्पादनात वाढ करण्यासाठी केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय तेलबिया व तेलताड अभियान [National Mission on Oilseed and Oil Palm (NMOOP)] सन २०१४-१५ पासून राज्यात राबविण्यात येत आहे. सदर अभियानांतर्गत लघुअभियान-१ (तेलबिया), लघुअभियान-२ (तेलताड) व लघुअभियान-३ (वृक्षआधारित तेलबिया) या तीन लघुअभियानांचा समावेश आहे.तथापि, सद्यस्थितीत लघुअभियान-१ व लघुअभियान-३ या दोन अभियानाची अंमलबजावणी करण्यात येत आहे. यामध्ये केंद्र व राज्य हिश्श्याचे प्रमाण ६०:४० असे आहे.

केंद्र शासनाने सन २०१९-२० मध्ये राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान अंतर्गत (गळीतधान्य व तेलताड) अभियान राबविण्यासाठी संदर्भ क्र.४ येथील दि.२६/०६/२०१९ च्या पत्रान्वये रु.५२७२.८६ लाख (केंद्र हिस्सा रु.३१६६.६० लाख व राज्य हिस्सा रु.२१०६.२७ लाख) एवढया रकमेचा वार्षिक कृती आराखडा मंजूर केला आहे. सदर रकमेच्या कार्यक्रमास संदर्भ क्र.५ येथील दि.०८/०७/ २०१९ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे.

सन २०१९-२० मध्ये राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान अंतर्गत (गळीतधान्य व तेलताड) अभियानाकरिता प्राप्त केंद्र हिश्श्याच्या निधीपैकी राज्य शासनाकडे अखर्चित असलेला ₹ ७३७.८७ लाख निधी सन २०१९-२० मध्ये विनियोगात आणण्यासाठी केंद्र शासनाने संदर्भ क्रमांक ६ येथील दि. २४/०७/२०१९ च्या पत्रान्वये अंतरिम उपयोगीता प्रमाणपत्राच्या आधारे पुनर्जिवित करुन दिला आहे. त्यापैकी राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान अंतर्गत (गळीतधान्य व तेलताड) अभियानाकरिता अनुसूचित जाती प्रवर्गासाठी केंद्र हिश्श्याचा ₹२४६.७१ लाख निधी व त्यानुसार राज्य हिश्श्याचा ₹१६४.४७ लाख निधी अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर वितरीत करणे आवश्यक आहे. तसेच अनुसूचित जाती प्रवर्गाच्या अखर्चित निधीपैकी लघुअभियान-१ (तेलबिया) करिता ₹ १२.४६ लाख निधी (केंद्र ₹ १०.०८ लाख + राज्य ₹ २.३८ लाख) अभियानाच्या PFMS संलग्न बँक खात्यावर शिल्लक आहे. सबब, अनुसूचित जाती प्रवर्गाचा एकूण अखर्चित निधी ₹४११.१८ लाख निधी पुढीलप्रमाणे वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**(₹ लाखात)**

| अ.क्र. | उपअभियान | उपलब्ध केंद्र हिस्सा | | | राज्य हिस्सा (४०%) | | | एकूण एकंदर | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | BEAMS | PFMS | एकूण | BEAMS | PFMS | एकूण | BEAMS | PFMS | एकूण |
| १. | राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान क्र.१ (तेलबिया) | २३२.३१ | १०.०८ | २४२.३९ | १५९.२१ | २.३८ | १६१.५९ | ३९१.५२ | १२.४६ | ४०३.९८ |
| २. | राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान क्र.३ (वृक्षजन्य तेलबिया) | ४.३२ | - | ४.३२ | २.८८ | - | २.८८ | ७.२० | - | ७.२० |
| | एकूण | २३६.६३ | १०.०८ | २४६.७१ | १६२.०९ | २.३८ | १६४.४७ | ३९८.७२ | १२.४६ | ४११.१८ |

सबब, अनुसूचित जाती प्रवर्गाचा अखर्चित निधी ₹३९८.७२ लाख आणि PFMS वरील एकूण ₹१२.४६ लाख असा एकूण ₹४११.१८ लाख निधीचा विनियोग करण्यास मान्यता देणे तसेच, सदर अखर्चित निधीपैकी शासन स्तरावर उपलब्ध असलेल्या केंद्र हिश्श्याच्या ₹ २३६.६३ लाख निधीचे व समरुप राज्य हिश्श्याच्या ₹१६२.०९ लाख निधीचे वितरण करण्याबाबत शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णयः**

१. सन २०१८-१९ करीता राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान अंतर्गत (गळीतधान्य व तेलताड )करिता अनुसूचित जाती प्रवर्गासाठी प्राप्त केंद्र हिश्श्याच्या निधीपैकी अखर्चित असलेला केंद्र हिश्श्याचा रु.२४६.७१ केंद्र व राज्य हिश्श्याचा रु.३९८.७२ लाख असा एकूण ₹ ४११.१८ लाख निधी ( रुपये चार कोटी अकरा लाख अठरा हजार फक्त) पुनर्जिवित करुन सन २०१९-२० मध्ये सदर अभियानांतर्गत

(गळीतधान्य व तेलताड ) अनुसूचित जाती प्रवर्गासाठी विनियोगात आणण्यास मान्यता प्रदान करण्यात येत आहे .

२. परिच्छेद क्र १.अन्वये पुनर्जिवित केलेल्या ₹ ४११.१८ लाख निधीपैकी लघुअभियान-१ (तेलबिया) करिता **केंद्र हिश्श्याचा १०.०८ लाख व राज्य हिश्श्याचा ₹ २.३८ लाख असा एकूण ₹१२.४६ लाख निधी** राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियानाच्या PFMS संलग्न बँक खात्यावर शिल्लक असून तो सन २०१९-२० मध्ये विनियोगात आणावा.

३. परिच्छेद क्र.१ अन्वये पुनर्जिवित केलेल्या ₹ ४११.१८ लाख निधीपैकी **केंद्र हिश्श्याचा ₹२३६.६३ लाख (रुपये दोन कोटी छत्तीस लाख त्रेसष्ठ हजार फक्त) व राज्य हिश्श्याचा ₹१६२.०९ लाख (रुपये एक कोटी बासष्ठ लाख नऊ हजार ) निधी आयुक्त (कृषि) यांना अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात येत असून** तो सन २०१९-२० मध्ये पुढील लेखाशिर्षांतर्गत अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या तरतुदीतून खर्ची टाकावा.

| मागणी क्र. | राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान (केंद्र हिस्सा) | राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान (राज्य हिस्सा) |
|---|---|---|
| D-३ | २४०१ A१६३ | २४०१ A१७२ |

४. सन २०१९-२० मध्ये राज्यात सदर अभियानाची अमंलबजावणी व सनियंत्रण करण्याच्या दृष्टीने निधी आहरण व वितरण करणेसाठी पुढीलप्रमाणे नियंत्रण तसेच आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

| अ.क्र. | स्तर | नियंत्रण अधिकारी | आहरण व संवितरण आधिकारी |
|---|---|---|---|
| १ | आयुक्तालय स्तर | आयुक्त (कृषि), कृषी आयुक्तालय, पुणे | सहाय्यक संचालक (लेखा-१) कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य पुणे. |
| २ | जिल्हा स्तर | संबंधित जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी | संबंधित जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी कार्यालयातील लेखाधिकारी |

५. शासन निर्णयान्वये कृषी उन्नती योजना-राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान (तेलबिया व वृक्षजन्य तेलबिया) करिता उपलब्ध करुन देण्यात येणाऱ्या केंद्र व राज्य हिस्स्याच्या ४११.१८ लक्ष रक्कमेचे जिल्हा निहाय/ कार्यालय निहाय वाटप करण्याकरिता संचालक (विस्तार व प्रशिक्षण) यांना प्राधिकृत करण्यात येत असून त्यांनी अभियानांतर्गत जिल्हा निहाय वाटप करावयाचा निधी PFMS प्रणालीद्वारे सर्व संबंधित जिल्हयांना वितरीत करावा.

६. सदर निधी खर्च करताना संदर्भ क्र.५ येथील दि.०८/०७/ २०१९ च्या शासन निर्णयातील अटी, शर्ती व कार्यपद्धतीचे पालन करण्यात यावे.

७. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.६७४/२०१९/व्यय-१४, दि.२०/११/२०१९ अन्वये दिलेल्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचे सांकेतांक २०२००३१९१७४२३३२५०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

ZENDAGE MAHAVEER BALASAHEB

Digitally signed by ZENDAGE MAHAVEER BALASAHEB
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=a9503a5209c984c11d292912b642bdfd32282e4276fb5541f4f92f23cb110d23, postalCode=400032, street=MADAM CAMA ROAD,MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=43d7bb272129cd1382853268481cb2ceee1f236d393acecb71084bc36ffeed02, ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=ZENDAGE MAHAVEER BALASAHEB
Date: 2020.03.19 17:50:30 +05'30'

**( महावीर झेंडगे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१. मा. मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव
२. मा. राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव
३. मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा, विधानमंडळ, मुंबई
४. मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद, विधानमंडळ, मुंबई
५. प्रधान सचिव, आदिवासी विकास /सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
७. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे (५ प्रती)
८. संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, पुणे
९. सर्व जिल्हाधिकारी
१०. सर्व विभागीय कृषि सहसंचालक
११. सर्व जिल्हा अधीक्षक कृषि अधिकारी
१२. सर्व कृषी विकास अधिकारी, जिल्हा परिषद
१३. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१४. सर्व मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद
१५. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ, शास्त्रीनगर, अकोला
१६. सह संचालक लेखा व कोषागरे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय भवन, पाचवा मजला,मंत्रालयासमोर, मुंबई -३२
१७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञयेता / लेखा परिक्षा) महाराष्ट्र १ /२, मुंबई / नागपूर
१८. महालेखाकार ( स्थानीय निकाय लेखापरिक्षा व लेखा ), प्रतिष्ठा भवन ,१०१ महषी कर्वे मार्ग, मुंबई-४०० ०२०
१९. नियोजन विभाग (कार्यासन - १४३१ / कार्यासन - १४४४), मंत्रालय, मुंबई - ३२
२०. वित्त विभाग (व्यय-१) /अर्थसंकल्प -१३) मंत्रालय, मुंबई - ३२
२१. निवडनस्ती (कार्यासन-४अे)